**जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, नंदुरबार इमारती बांधकामाच्या अन्य कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक :ग्रासंजा/१२१३/४४५/प्र.क्र.१६५/ग्रासं-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय (वि), मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ ऑगस्ट, २०१८

वाचा :-

१. शासन निर्णय, क्रमांक ग्रासंजा-१६०६/११९७/प्र.क्र.२१९८/ग्रासं-४, दि.०७.११.२००८.
२. राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र. राआ/महा/आस्था-४/नंदुरबार इमारत बांधकाम/२०१७/३३३०, दि.२९.०६.२०१७.

प्रस्तावना :-

जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, नंदुरबार या इमारतीच्या बांधकामाकरीता रु.४८.७२ लक्ष इतक्या रकमेच्या मूळ अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानंतर जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, नंदुरबार या कार्यालयाच्या इमारतीमध्ये आवारभिंत बांधणी, रॅम्प ध्वज स्तंभ, वाहन तळ व बगिचा, फर्निचर (विद्युतीकरणासहीत), पाणीपुरवठा योजना इत्यादी कामांसाठी रु. ८०,६२,९०३/- इतक्या रकमेचा संदर्भाधीन पत्र क्र.२ अन्वये प्राप्त प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावाच्या छाननीअंती अंदाजपत्रकामध्ये विम्याची तरतूद वगळून आकस्मिक खर्च ४% व सेंटेज चार्जेस अशी सुधारीत तरतूद करुन अंदाजपत्रकाची किंमत रु.८२,८७,४९१/- इतकी सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित केली. त्यानुसार सदर बांधकामाच्या रकमेच्या अंदाजपत्रकास नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

२. जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, नंदूरबार हे मंच सन २०13 पासून स्वतंत्र नवीन इमारतीत कार्यरत आहे. या इमारतीमध्ये आवारभिंत बांधणे, ध्वजस्तंभ, फर्निचर (विद्युतिकरणासहीत) व पाणीपुरवठा यासाठी करावयाचा खर्च करणे बाकी आहे. याकरिता राज्य आयोगाने रु.८०,६२,९०३/- इतक्या रकमेचा सादर केलेला प्रस्ताव मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर केला असता, त्या विभागाने प्रस्तावाच्या छाननीअंती अंदाजपत्रकामध्ये विम्याची तरतूद वगळून आकस्मिक खर्च ४% व सेंटेज चार्जेस अशी सुधारीत तरतूद करुन अंदाजपत्रकाची किंमत खालीलप्रमाणे परिगणित केली आहे.

| **अ.क्र.** | **बांधकामाचे स्वरुप** | **राज्य आयोगाने प्रस्तावित केलेली अंदाजित किंमत (रु.)** | **सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित केलेली किंमत (रु.)** |
|---|---|---|---|
| १. | आवारभिंत | १९,३२,६४४/- | १९,९६,७६०/- |
| २. | रॅम्प, ध्वजस्तंभ | ६,४४,४२२/- | ६,६५,८०१/- |
| ३. | वाहनतळ व बगिचा | १३,८९,३२०/- | १४,३५,४१२/- |
| ४. | फर्निचर (विद्युतीकरणासह) | २५,०७,०७७/- | २५,४७,३४८/- |
| ५. | पाणीपुरवठा योजना | १५,८९,४४०/- | १६,४२,१७०/- |
| | **एकूण** | **८०,६२,९०३/-** | **८२,८७,४९१/-** |

३. जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, नंदुरबार या मंचाच्या इमारतीच्या उपरोक्त कामासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने या विभागाकडे उपलब्ध असलेल्या अनुदानातून खर्च भागविण्याच्या अटीच्या अधिन राहून सहमती दर्शविली आहे. त्यानुसार, वरील जिल्हा मंचाच्या कामासाठी रु.८२,८७,४९१/- (अक्षरी रु. ब्याऐंशी लाख सत्याऐंशी हजार चारशे एक्याण्णव फक्त) एवढया रकमेस नव्याने प्रशासकीय मान्यता याद्वारे देण्यात येत आहे.

४.  वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता दिलेल्या कामास निधी उपलब्ध होताच तातडीने सुरुवात करावी व ते विहित मुदतीत पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी. सदर इमारतीचे काम पूर्ण होताच उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५.  वरील कामावरील खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

६.  प्रस्तावित कामाचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील-:

| अ.क्र. | आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च (रु.) | सुरु असलेल्या इतर कामासाठी आवश्यक तरतूद (रु.) | एकूण मंजूर तरतूद (रु.) |
|---|---|---|---|---|
| १. | सन २०१८-१९ | ८२,९७,४९१/- | -- | १६,९०,००,०००/- |

७.  सुरु होत असलेल्या कामाचा वित्तीय नियोजनासह तपशील पुढीलप्रमाणे राहील-:

| अ. क्र. | कार्यालयाचे नाव | कामाचे स्वरुप | एकूण अपेक्षित खर्च (रु.) | मागील वर्षाअखेर झालेला खर्च | चालू वर्षात अपेक्षित खर्च | पुढील वर्षासाठी करावयाची तरतूद (Carry forward) |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, नंदुरबार | कार्यालयाची आवारभिंत, रॅम्प व ध्वजस्तंभ, वाहनतळ बांधकाम व बगिचा, फर्निचर (विद्युतीकरणासह), पाणीपुरवठा योजना | ८२,९७,४९१/- | -- | ८२,९७,४९१/- | -- |

८. सदर बांधकामासाठी येणारा खर्च "मागणी क्र. एम-५, मुख्य लेखाशिर्ष ५४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवावरील भांडवली खर्च, १०२, नागरी पुरवठा (००) (००) (०१) ग्राहक मंचासाठी इमारतीचे बांधकाम करणे (५४७५०२३९) ५३- मोठी बांधकामे "या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९. प्रस्तुत आदेश, वित्त विभाग क्र. विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११.०७.२००१ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-५ मधील अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४२/इमारत-२, दि.२४.०३.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०८३०१६४८५५०६०६ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Raju Kalluji Narpande

Digitally signed by Raju Kalluji Narpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c9bb69da44e8b03c93d1a880163547bbb4787f2f2839b6277a288182cbf623cb, cn=Raju Kalluji Narpande
Date: 2018.08.30 16:53:34 +05'30'

**(राजू क. नरपांडे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत -:**

१. मा.मंत्री, अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग ,मंत्रालय ,मुंबई यांचे खाजगी सचिव.

२. मा. राज्यमंत्री ,अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय ,मुंबई यांचे खाजगी सचिव.

३. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.

४. प्रधान सचिव, अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग ,मंत्रालय ,मुंबई यांचे स्वीय सहयक.

५. प्रधान सचिव, (विधि व परामर्शी),विधी व न्याय विभाग यांचे स्वीय सहाय्यक.

६. जिल्हाधिकारी, नंदुरबार.

७. प्रबंधक(प्रशासन), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.

८. प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच ,नंदुरबार.

९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग ,नंदुरबार.

१०.जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.

११.महालेखापाल, -१/२ (लेखापरिक्षा) महाराष्ट्र ,मुंबई / नागपूर.

१२.महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता ,महाराष्ट्र, मुंबई / नागपूर).

१३.निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

१४.वित्तीय सल्लागार व उप सचिव अन्न ,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

१५.निवडनस्ती/ग्रासं-४.